**जंजिरा किल्ला, ता.मुरुड, जि.रायगड येथे जेट्टी व ब्रेकवॉटरचे बांधकाम करणे या रु. १११.४१ कोटी इतक्या रक्कमेच्या कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : एमआयएस ०२२२/प्र.क्र.१३/बंदरे-२**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक : २८ एप्रिल,२०२२

**वाचा :-** १. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई यांचे पत्र जा.क्र.ममेबो/मुकाअ /अभि -३/जंजिरा जेट्टी/२०२१-२२/२९७ दि.२१.०१.२०२२

२. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई यांचे पत्र जा.क्र. ममेबो/मुकाअ /अभि -३/जंजिरा जेट्टी/२०२१-२२/२५५ दि.१५.०३.२०२२

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्राला मोठा सागरी किनारा लाभलेला आहे. सृष्टीसौंदर्याने नटलेल्या या सागर किना-याजवळ अनेक प्रेक्षणीय आणि ऐतिहासिक घटनांना उजाळा देणारी अनेक स्थळे आहेत. या किना-याजवळ असलेल्या जलदुर्गामध्ये रायगड जिल्हयातील मुरुड-जंजिरा हा अभेदय किल्ला असून चारही बाजूने अरबी समुद्राने वेढलेला आहे. राजापूरी जेट्टीवरुन या किल्लयाकडे जाण्यासाठी देशी व विदेशी पर्यटकांना शिडांच्या होडयांनी जावे लागते. जंजिरा किल्लयावर बोटीने उतरण्यासाठी सुसज्ज अशी जेट्टी नाही, त्यामुळे पर्यटकांना जंजिरा किल्यामध्ये बोटीतून सुरक्षितपणे चढण्या/उतरण्यासाठी सोय उपलब्ध नाही. काहीवेळेस सदर ठिकाणी अपघात होण्याची शक्यता देखील नाकारता येत नाही. त्यामुळे प्रवाशांना/पर्यटकांना जंजिरा किल्यामध्ये प्रवेश करताना बोटीतून सुरक्षितपणे चढणे/उतरणे सोय उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे.

त्याअनुषंगाने जंजिरा किल्ला,ता.मुरुड,जि.रायगड येथे जेट्टी व ब्रेकवॉटरचे बांधकाम करणे या कामाचा प्रस्ताव मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांनी सादर केला असून सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सागरमाला कार्यक्रमाअंतर्गत जंजिरा किल्ला,ता.मुरुड,जि.रायगड येथे जेट्टी व ब्रेकवॉटरचे बांधकाम करणे या प्रस्तावित कामांच्या रु.१११,४१,२६,०७७/- (अक्षरी किमत रु. एकशे अकरा कोटी एक्केचाळीस लक्ष सव्वीस हजार सत्त्याहत्तर मात्र ) एवढया रक्कमेच्या ढोबळ अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर कामास पर्यावरण व पुरातत्व संबंधित तसेच अन्य वैधानिक परवानग्या घेण्यात याव्यात.
२. सदर प्रशासकीय मान्यतेचे आदेश हे केंद्र शासनाला प्रस्ताव पाठविणे व वैधानिक परवानग्या घेणे याकरिताच मर्यादित असतील.
३. केंद्र शासनाची परवानगी/मान्यता प्राप्त झाल्याशिवाय सदर कामावर खर्च केला जाणार नाही.

२. केंद्र शासनाकडून सदर कामास सागरमाला कार्यक्रमांतर्गत मान्यता प्राप्त झाल्यानंतर सदर प्रकल्प कार्यान्वित करणेस महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. सदर कामाच्या अंदाजपत्रकात खालील बाबींचा समावेश करण्यात आलेला आहे.

१. ब्रेकवॉटर २५० मी. लांबी
२. पाईल जेट्टी ४८.०० मी x ०७.५० मी.
३. ॲल्युमिनिअम लिंकस्पॅन
४. सोलार लाईट

जंजिरा किल्ला, ता.मुरुड,जि.रायगड येथे जेट्टी व ब्रेकवॉटरचे बांधकाम करणे या प्रस्तावित कामांच्या रु.१११,४१,२६,०७७/- एवढया रक्कमेच्या ढोबळ अंदाजपत्रकाचा तपशील खालीलप्रमाणे.

| Sr. No. | Description | Amount (Rs.) |
|---|---|---|
| | **Part A (Civil works)** | |
| 1 | Construction of Pile Jetty | 8,51,31,540.00 |
| 2 | Construction of Breakwater | 81,54,81,003.00 |
| **(A)** | **Cost of civil works** | 90,06,12,543.00 |
| | **Part B (Testing and Royalty Charges)** | |
| 3 | Quality Control Testing Charges | 13,60,679.00 |
| 4 | Royalty Charges | 2,75,27,283.00 |
| **(B)** | **Cost of Testing and Royalty** | 2,88,87,962.00 |
| | **Sub Total (Part A + Part B)** | 92,95,00,505.00 |
| (i) | 0.5% Labour insurance on cost of Civil Works (A) | 45,03,063.00 |
| (ii) | 4% Contingencies on cost of Civil Works (A) | 3,60,24,502.00 |
| (iii) | 4% Consultancy Charges on cost of Civil Works (A) | 3,60,24,502.00 |
| (iv) | 12% GST on cost of Civil Works (A) | 10,80,73,505.00 |
| | **Grand Total** | 1,11,41,26,077.00 |

४. या कामावरील होणारा खर्च "मागणी क्र. बी-७, ३०५१- बंदरे व दिपगृहे ०२, लहान बंदरे, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना सहाय्य, (००)(०३) जेट्टीच्या बांधकामाकरिता केंद्राचे सहाय्य (सागरमाला) (राज्य हिस्सा ५०%) (कार्यक्रम) ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान (३०५१ १८९१)" या लेखाशीर्षाखालील मंजूर तरतुदीतून भागविण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय केंद्र शासनाचया सागरमाला कार्यक्रमास मान्यता देणेबाबतच्या मा. मंत्रीमंडळाच्या दि.१९.०९.२०१७ रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार आणि नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनौसं.क्र.९८/१४६१ दि.०४.०४.२०२२ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.अनौ सं.क्र.१७३/२०२२/व्यय-८ दि.०७.०४.२०२२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२२०४२८१५५१३३५४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NILIMA MAHADEV KAMBLE

Digitally signed by NILIMA MAHADEV KAMBLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=0a1748b905e770db90369b30966380ad4482c802aeb9a208c0273473e9c24d7e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B635A0BA362D807D0A2AD2942C69531FAFE53ABFCAC9AB809231BD295B40EBE2, cn=NILIMA MAHADEV KAMBLE
Date: 2022.04.28 15:53:05 +05'30'

**( निलीमा कांबळे )**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई.
२.वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई-३२.
३.नियोजन विभाग (का. १४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
४.अपर मुख्य सचिव(परिवहन व बंदरे), गृह विभाग.
५.मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई
६.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८.कार्यासन अधिकारी, बीयुडी-१, गृह विभाग.
९. निवडनस्ती (बंदरे-२)